नैसर्गिक आपत्तीमध्ये नुकसान झालेल्या आपद्ग्रस्त शेतक-यांना बियाणे व **खताच्या स्वरुपात मदत देणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक: नैसआ १०/२०००/प्र.क्र. ३८४/२१-अे,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- १८ सप्टेंबर, २०००.

वाचा :- १) शासन निर्णय कृषि व सहकार विभाग क्र. आयएसटी १०८२/१३८८७/-सीआर ८६/३ अे, दि. १६ जुलै, १९८३.
२) शासन निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, क्रमांक- नैसआ १०९५/प्र.क्र. २६/१३ अे, दिनांक २३ जुन, १९९५.

**शासन निर्णय :-**

वरील क्र. २ येथील शासन निर्णय दि. २३ जून, १९९५ च्या स्थायी आदेशान्वये नैसर्गिक आपत्तीमुळे शेती पिकांचे नुकसान झालेल्या शेतक-यांना प्रति हेक्टरी रु. १०००/- याप्रमाणे दोन हेक्टर मर्यादेपर्यंत बियाणे स्वरुपात्त मदत देण्याबाबत आदेश निर्गमीत करण्यात आले आहेत. आता अशा बियाणे स्वरुपातील मदती नंतर शिल्लक राहणा-या मदतीच्या रकमेची रासायनिक खते देण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. उदा:- एक हेक्टर क्षेत्रावर सुधारित बाजरीची पेरणी करण्यासाठी ४ किलोची मात्रा निश्चित करण्यात आलेली आहे. सुधारित बाजरीचा प्रति किलो बियाण्याचा दर रु. २१/- असा गृहित धरल्यास एक हेक्टर क्षेत्रासाठी रु. ८४/- इतक्या किंमतीच्या बियाणेची आवश्यकता आहे. म्हणुन अशा शेतक-यांना उर्वरित ९१६/- (१०००-८४) इतक्या किंमतीची रासायनिक खते देय राहतील. परंतु ज्या बियाणाची किंमत (उदा.भुईमूग, सोयाबिन, इ.) प्रति हेक्टरी रु. १०००/- किंवा त्या पेक्षा जास्त आहे, अशा शेतक-यांना रासायनिक खते देय रहाणार नाहीत.

GR-20020121174208000-0400

उपरोक्त कार्यक्रमाची अंमलबजावणी दि. १ मे, २००० पासून करण्यात यावी.

हे आदेश महसूल व वन विभाग/वित्त विभाग यांचे सहमतीने तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. प्र.क्र. ४०८/२०००/व्यय-१, दि. २५/७/२००० अन्वये निर्गमीत करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(उ.द. वाळुंज)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन,
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,

प्रति,

मा.मुख्यमंत्र्यांचे स्वीय सहाय्यक.
मा.मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक.
मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक.
मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक.
आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे.
फलोत्पादन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व विभागीय आयुक्त.
विभागीय कृषि सहसंचालक (विस्तार) (सर्व)
अधिक्षक फलोत्पादन अधिकारी (सर्व)
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
महसूल व वन विभाग/म-३
वित्त विभाग/व्यय-१
सर्व कक्ष अधिकारी.

GR-200201211742 08000-0400